आश्रमशाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी / वसतिगृहातील कर्मचारी यांच्या सेवा इतरत्र न वापरण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

आदिवासी विकास विभाग,

शासन परिपत्रक क्रमांक : आस्था-२०१०/प्र.क्र.१२५/का.१५

दिनांक : १८ जून, २०१०

**प्रस्तावना**:-आदिवासी विकास विभागाच्या नियंत्रणाखालील आश्रमशाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना त्याबरोबरच वसतिगृहातील कर्मचाऱ्यांना प्रतिनियुक्तीने व तात्पुरत्या व्यवस्था करुन प्रकल्प कार्यालये तसेच अपर आयुक्त कार्यालये येथे नियमबाहयपणे सेवेत ठेवले जात आहे. नियमानुसार अशा प्रकारच्या बदल्या अथवा तात्पुरत्या नियुक्त्या करता येत नाहीत. कारण त्यामुळे संबंधित कर्मचाऱ्यांच्या मूळ कार्यालयातील कामकाजावर विपरित परिणाम होत आहे. तसेच शासकीय आश्रमशाळा व वसतिगृहे यामधील कर्मचाऱ्यांच्या वेळोवेळी बदल्या करण्यात येतात. परंतु सदरहू कर्मचारी बदलीच्या ठिकाणी रुजू न होता आपआपसात अंतर्गत व्यवस्था करुन बदलीपूर्वीच्या ठिकाणीच कार्यरत राहतात. परंतु त्यांचे वेतन मात्र बदलीच्या ठिकाणावरुन काढण्यात येते. संबंधित अपर आयुक्त व संबंधित प्रकल्प कार्यालयातील कर्मचाऱ्यांशी संगनमत करुन अशा प्रकारच्या व्यवस्था होत असल्याच्या बाबी शासनाच्या निदर्शनास आल्या आहेत. त्यामुळे या प्रकरणी आता पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत :-

**शासन परिपत्रक** :- शासकीय आश्रमशाळा शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना तसेच वसतिगृहातील कर्मचाऱ्यांना बदलीने, प्रतिनियुक्तीने अथवा तात्पुरत्या व्यवस्था करुन प्रकल्प कार्यालये अथवा अपर आयुक्त कार्यालयात कामावर ठेवण्यात येऊ नये. तसेच सद्यःस्थितीत अशाप्रकारे प्रतिनियुक्तीने / बदलीने अथवा तात्पुरत्या व्यवस्थेने कार्यरत असणाऱ्या सर्व शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना तात्काळ कार्यमुक्त करुन त्यांच्या मूळ आस्थापनेवर परत पाठविण्यात यावे.

२. बदलीच्या आदेशानंतर आश्रमशाळा शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी बदलीच्या ठिकाणीच कार्यरत राहतील व त्यांचे वेतन त्यांच्या कार्यालयातून काढण्यात येईल, याची जबाबदारी संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्याची राहिल. तसेच आश्रमशाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना बदलीच्या ठिकाणी रुजू न होण्यासाठी व पूर्वीच्याच ठिकाणी कार्यरत राहण्यासाठी आपआपसात अंतर्गत व्यवस्था करु दिली जाणार नाही.

३. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास व सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांनी परिपत्रकातील वरील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच परिपत्रकातील सूचनांचे उल्लंघन केल्याचे शासनाच्या निदर्शनास आल्यास संबंधित अपर आयुक्त अथवा संबंधित प्रकल्प अधिकारी यांच्याबरोबरच संबंधित कार्यालयातील आस्थापनाविषयक बाबींचे कामकाज हाताळणारे कार्यालय अधीक्षक, सहायक प्रकल्प अधिकारी (प्रशासन), सहायक आयुक्त (प्रशासन), उप आयुक्त (प्रशासन) यांनाही जबाबदार धरण्यात येईल व त्यांच्याविरुध्दही शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल.

४. हे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या अधिकृत संकेतस्थळावर ( www.maharashtra.gov.in ) उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००६१८३४९०३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( अं. स. चंदनशिवे ) १८.६.२०१०

कार्यासन अधिकारी.

प्रत,

मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. प्रधान सचिव, आदिवासी विकास यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
सर्व सह सचिव / उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक ( १० प्रती )
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे ( १० प्रती )
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्यादित, नाशिक
व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ, नाशिक
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे / नाशिक / अमरावती / नागपूर ( प्रत्येकी ५ प्रती )
सह आयुक्त तथा उपाध्यक्ष, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती, ठाणे / नाशिक / पुणे / नंदुरबार / अमरावती / औरंगाबाद / नागपूर / गडचिरोली
सर्व उपआयुक्त / सहायक आयुक्त, मार्फत संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प ( प्रत्येकी ५० प्रती )
सर्व सहायक प्रकल्प अधिकारी, मार्फत संबंधित प्रकल्प अधिकारी
सर्व मुख्याध्यापक, शासकीय आश्रमशाळा, मार्फत- संबंधित प्रकल्प अधिकारी
सर्व कार्यालयीन अधीक्षक, मार्फत- संबंधित प्रकल्प अधिकारी
सर्व अवर सचिव / कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती, का.१५

-----------